विशेष केंद्रीय सहाय्य योजनेकरीता सन २०१६-१७ करीता प्राप्त निधी वितरणास मान्यता देण्याबाबत (दुसरा हफ्ता).

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०१६/प्र.क्र.६४/का.-१९

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ३०/०३/२०१७

वाचा -

१. आदिवासी विकास विभागाचे पत्र क्र.केंद्रीय २०१६ /प्र.क्र.०९/का-१९ दि.२९/०७/२०१६
२. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/०८/२०१६-TSP, दि.२७/०६/२०१६ (दोन पत्रे)
३. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No. ११०१५/०८/२०१६-TSP, दि.२७/०९/२०१६ (दोन पत्रे)
४. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No. ११०१५/०८/२०१६-TSP, दि.३०/०९/२०१६
५. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/४(१४)/२०१६-Grant, दि.०१/०३/२०१७
६. शासन निर्णय केंद्रिय-२०१६/प्र.क्र.६४/का.-१९ दि २१/०३/२०१७

प्रस्तावना (Preamble) -

राज्य शासनाच्या संदर्भ क्र. १ वरील पत्राद्वारे विशेष केंद्रीय सहाय्य योजनेकरीता सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता प्रस्ताव केंद्र शासनास सादर करण्यात आले आहेत. सादर प्रस्तावांच्या अनुषंगाने एकुण रु. ९५४७.०० लक्ष इतका निधी वितरीत केला आहे. सदर वितरीत निधीतून करावयाच्या कामांना संदर्भ क्र. ४ वरील पत्रान्वये मान्यता प्रदान केली आहे. यापैकी रु. ९०३०.०० लक्ष निधी संदर्भ क्र. ६ वरील शासन निर्णयाने यापुर्वी वितरीत करण्यात आला आहे. आता उर्वरीत रु. ५१७.०० लक्ष इतकी रक्कम मंजूर कामांवर खर्च करण्यासाठी अंमलबजावणी यंत्रणेस वितरीत करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती.

## शासन निर्णय (Government resolution)-

शासन आता या निर्णयाद्वारे केंद्र शासनाने विशेष केंद्रीय सहाय्य योजनेखाली सन २०१६-१७ करिता वितरीत एकूण रु. ५१७.०० लक्ष निधीतुन पुढील कामांकरीता तालिकेत स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविलेल्या निधीच्या मर्यादेत खर्च करण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | योजनेचे नाव | वितरीत करण्यात येणारा निधी (रु.लाखात) |
|---|---|---|
| १ | २ | ४ |
| १. | Establishment of Bamboo processing unit at Gadchiroli | ५१७.०० |
| | **एकुण** | **५१७.००** |

उपरोक्त रु. ५१७.०० लक्षचा खर्च मागणी क्र. टी-५, मुख्य लेखाशीर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - ०२ - अनुसूचित जमातीचे कल्याण - ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (४२) विशेष केंद्रीय सहाय्य, ३१ सहायक अनुदाने (२२२५ ३५५६) (वेतनेतर) यामधील सन २०१६-१७ मध्ये अर्थसंकल्पित असलेल्या निधीतून करण्यात यावा.

सदर निधी अर्थसंकल्पिय अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आला आहे. वितरीत निधीच्या मर्यादेत निधी आहरीत करण्याची दक्षता आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी घ्यावी.

उपरोक्त मंजूर करण्यात आलेले अनुदान ते ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे, त्याच बाबींसाठी खर्च करावे व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

**सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २४७/अर्थोपाय, दिनांक २७/०६/२०१६, अनौ-४४/अर्थोपाय, दि. ३०/०१/२०१७ व अनौ-१७०/अर्थोपाय, दि. २९/०३/२०१७अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१९२६२८६१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prabhakar Bapurao Gawade

Digitally signed by Prabhakar Bapurao Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prabhakar Bapurao Gawade
Date: 2017.03.30 19:28:37 +05'30'

**( प्रभाकर बा. गावडे )**
उपसचिव

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. अवर सचिव, भारत सरकार, जनजाती कार्य मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली.
४. खाजगी सचिव, मा. मंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. उपसचिव, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी , का-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.